**नामनिर्देशनाने नियुक्ती,**
**सहाय्यक प्राध्यापक, भौतिकशास्त्र**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः नियुक्ती -२०१६/(८४/१६)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०९/१२/२०१६

वाचा:- १. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांकः १५(२)(१८९)/१३०१२/सात,ब, दि.०३/३/२०१६
२. संचालक , उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.ममअ-२०१६/नियुक्ती/ प्रशा-१/१३००३,दिनांक १९/११/२०१६
३. शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती -२०१६/( ८४/१६)/मशि-१, दिनांक १९/११/२०१६

**शुध्दीपत्रक :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांच्या सहाय्यक प्राध्यापक, भौतिकशास्त्र, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट 'अ' (महाविद्यालयीन शाखा) या पदावर संदर्भ क्रमांक ३ अन्वये पदस्थापना करण्यात आल्या होत्या. परंतु शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, नागपूर येथे एकूण ३ पदे मंजुर असून पैकी १ सहाय्यक प्राध्यापक कार्यरत आहे व अन्य २ पैकी एकाच सहाय्यक प्राध्यापकाचा कार्यभार उपलब्ध असल्याने अन्य एका उमेदवारांस म्हणजेच श्री. भोसले विष्णुदास कालीदास यांना शासकीय न्याय सहाय्यक विज्ञान संस्था, नागपूर येथून शासकीय विज्ञान संस्था, नागपूर येथे पदस्थापना करण्यात येत आहे. उमेदवार ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची जेष्ठता सुची तयार करताना महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठता विनियमन) नियमावली १९८२ मधील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे.

३. हे आदेश प्राप्त होताच संबधीत उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधीत संस्थाप्रमुखांकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी याबाबतचा अहवाल संचालकांमार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०९१०४२४५५९०८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha P Kini

Digitally signed by Manisha P Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha P Kini
Date: 2016.12.09 10:45:29 +05'30'

**( म.प्र.किणी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राव्दारे)
३. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर
४. संचालक, शासकीय विज्ञान संस्था, नागपूर

वरील उमेदवारांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी संस्थाप्रमुखांनी स्वत: करावी व सदर उमेदवारांस हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल सहसंचालक व संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.

५. संचालक, न्याय सहाय्यक विज्ञान संस्था, नागपूर
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर
८. संबधित सहाय्यक प्राध्यापक
९. निवड नस्ती.